केंद्र शासन पुरस्कृत दुधाचा महापूर योजने अंतर्गत नसलेल्या डोंगराळ व मागास जिल्हयांसाठी एकात्मिक दुग्ध दुग्ध विकास प्रकल्पांतर्गत उघडण्यात आलेली बँक खाती बंद करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०११/प्र.क्र. ३९०/पदुम-४**
**मंत्रालय, विस्तार, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक : ११ नोव्हेंबर, २०११**

**वाचा :- शासन निर्णय क्र. एविप्र-१०९७/२७१६१(१८९)/पदुम-४, दिनांक ०३.१०.१९९८**

**प्रस्तावना :-**

केंद्र शासन पुरस्कृत दुधाचा महापूर योजने अंतर्गत नसलेल्या डोंगराळ व मागास जिल्हयांसाठी एकात्मिक दुग्ध विकास प्रकल्प ही योजना राबविण्यासाठी दुधाळ संकरीत गार्यींचा/म्हशींचा पुरवठा करणेस्तव लाभार्थींची ५० टक्के रक्कम जमा करण्याकरीता ठाणे, रायगड, जालना, परभणी, अकोला व वाशिम या जिल्हयांचे जिल्हा पशुसंवर्धन उपसंचालक व त्यांचे कार्यालयातील सहाय्यक संचालक पशुसंवर्धन यांच्या संयुक्त नावे त्या त्या जिल्हयाच्या लिड बँकेमध्ये खाते उघडण्यास वाचा येथील दिनांक ०३.१०.१९९८ च्या शासन निर्णयान्वये मान्यता प्रदान करण्यात आलेली होती.

सदरची योजना आता बंद झाल्याने या योजनेच्या अनुषंगाने उघडण्यात आलेली बँक खाते बंद करुन सदर बँक खात्यात शिल्लक असलेली रक्कम चलनाने कोषागारात जमा करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. त्या अनुषंगाने खालील प्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासन पुरस्कृत दुधाचा महापूर योजने अंतर्गत नसलेल्या डोंगराळ व मागास जिल्हयांसाठी एकात्मिक दुग्ध विकास प्रकल्प ही योजना राबविण्यासाठी दुधाळ संकरीत गार्यींचा/म्हशींचा पुरवठा करणेस्तव लाभार्थींची ५० टक्के रक्कम जमा करण्याकरीता ठाणे, रायगड, जालना, परभणी, अकोला व वाशिम या जिल्हयांचे जिल्हा पशुसंवर्धन उपसंचालक व त्यांचे कार्यालयातील सहाय्यक संचालक पशुसंवर्धन यांच्या संयुक्त नावे त्या त्या जिल्हयाच्या लिड बँकेमध्ये खाते उघडण्यात आलेली होती. या योजनेचा कालावधी आता संपल्यामुळे सदरची बँक खाती बंद करण्यास याद्वारे शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

सदर खात्यामध्ये शिल्लक असलेला निधी चलनाने कोषागारात तात्काळ जमा करुन ही खाती बंद करण्यात यावीत.

सदरचा शासन निर्णय वित्त विभाग/ कोषा प्र-५ यांचे अनौपचारिक संदर्भ क्र. २३०/११/कोषा प्र-५ दिनांक १९.१०.२०११ अन्वये व त्यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशान्वये व नावाने,**

**(डॉ. मा. ना. सवाईसोनकांबळे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. प्रधान महालेखापाल, (लेखा परिक्षा) १/२ महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर
३. प्रधान सचिव, वित्त विभाग (कोषा प्र-५) मंत्रालय, मुंबई-३२
४. प्रादेशिक पशुसंवर्धन सहआयुक्त, (सर्व)
५. जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त, ठाणे, रायगड, जालना, परभणी, अकोला व वाशिम
६. जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे, रायगड, जालना, परभणी, अकोला व वाशिम
७. कोषागार अधिकारी, ठाणे, रायगड, जालना, परभणी, अकोला व वाशिम.
८. अवर सचिव, पदुम-३, कक्ष अधिकारी, पदुम-१/१६ कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९. निवड नस्ती (पदुम-४)

H:\Letters4.doc